पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिपद्वारे "शासकीय औ.प्र.संस्थांचा दर्जा वाढ करणे" या अंतर्गत औ.प्र.संस्थेतील २०% प्रवेश, संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.आयटीआय-२००९/(०५/०९)/व्यशि-५

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ७ जुलै, २०१०.

संदर्भ :-१) डि.जी.ई.टी.-३५(१३९६)/गाईडलाईन्स (पीटी)/२००७-एनआयसी, दि.२३ नोव्हेंबर, २००७ चे पत्र

२) डि.जी.ई.टी.-३५(१३९६)/गाईडलाईन्स (पीटी)/२००७-एनआयसी, दि.१८ मार्च, २००८ चे पत्र

३) डि.जी.ई.टी.-१९(२०)/२००७ सीडी,दि.१७ एप्रिल, २००८ चे पत्र

४) Letter No.DGET-35(1396)Clarifications(08-09)/2008-NIC, dated 28/5/2008 from Director (Adm.), Directorate General of Employment & & Training, New Delhi

४) संचालक (प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.२५/पीपीपी-१३९६/२००८/१९५, दि.२८ मे, २००८

५) संचालक (प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.२५/पीपीपी-१३९६/२००८/११६, दि.२९ जून, २००८

**प्रस्तावनाः-** केंद्र शासन पुरस्कृत खाजगी सहभागाने (Public Private Partnership) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा दर्जावाढ करण्याच्या योजनेतंर्गत केंद्र शासनाकडून प्रत्येक औ.प्र.संस्थेकरीता रु.२.५० कोटी इतकी व्याजमुक्त कर्जाऊ रक्कम सन २००७-२००८ पासून उपलब्ध करण्यांत येत आहे. या योजनेतंर्गत सन २००७-०८ ते सन २००९-१० या तीन वर्षांच्या कालावधीत एकूण १७७ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे. निवड करण्यांत आलेल्या सदरहू औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकरीता केंद्र शासनाकडून प्रत्येकी रु.२.५० कोटी बिनव्याजी कर्जाऊ रक्कम उपलब्ध करुन देण्यांत आलेली आहे. PPP योजने अंतर्गत IMC ला कौशल्य विकास करण्याच्या दृष्टीकोनातून संबंधित औ. प्र. संस्थेस औद्योगिक क्षेत्रास आवश्यक असलेले नवीन Trades / Sector मधील अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता आहे.

२. उपरोक्त योजना मंजूर करताना केंद्रीय मंत्रिमंडळाच्या Cabinet Committee for Economic Affairs (CCEA) यांनी संदर्भाधिन क्रमांक १ च्या पत्रानुसार संस्था व्यवस्थापन समितीने "PPP" योजने अंतर्गत सुरु कलेले नवीन Trades / Sector मधील अभ्यासक्रमात २०% प्रवेशाच्या जागा संस्था व्यवस्थापन समितीद्वारे भरणेबाबत शिफारस केली होती. संदर्भाधिन २ च्या पत्रानुसार प्रत्येक राज्याने संबंधित संस्था व्यवस्थापन समिती व राज्य सुकाणू समितीद्वारे संबंधित राज्याच्या गरजेनुसार २०% प्रवेशाबाबत निर्णय घ्यावा असे निर्देश दिलेले आहेत. .तसेच डि.जी.ई.टी., नवी दिल्ली यांच्या संदर्भांकित पत्र क्र.३ अन्वये औ.प्र.संस्थेमध्ये शिकविल्या जाणा-या सर्व व्यवसायात ३०% अधिसंख्य

जागा (Supernumery Seats) भरण्यास परवानगी देण्यांत आलेली आहे. त्याप्रमाणे संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करावयाच्या २०% प्रवेशाबाबतच्या कार्यपध्दतीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** : राज्यातील शासकीय औ.प्र.संस्थांमध्ये केंद्र शासन पुरस्कृत खाजगी सहभागाने (Public Private Partnership) संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) सुरु करण्यांत आलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी करावयाच्या २०% प्रवेश क्षमतेच्या कार्यपध्दतीबाबत चर्चा करण्यासाठी दि.२६ जून, २००९ रोजी राज्य सुकाणू समितीची बैठक आयोजित करण्यांत आली होती. सदर बैठंकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यांत आले.

१) PPP अंतर्गत निवड करण्यांत आलेल्या शासकीय औ.प्र.संस्थांतील संस्था व्यवस्थापन समितीच्या निधीतून ऑगस्ट, २०१० पासून पुढे सुरु करण्यांत येणा-या सर्व नविन व्यवसाय / तुकडयांमधील व्यवसायाच्या प्रवेशाबाबत, प्रवेश क्षमतेपेक्षा अधिकचे (सुपरन्युमरी ३० टक्के पैकी) २०% प्रवेश गुणानुक्रमे द्यावेत. याकरीता स्वतंत्र अर्ज मागवून व स्वतंत्र गुणवत्ता यादी तयार करुन प्रवेश करण्यांत यावेत.

२) ऑगस्ट,२००९ पासून PPP अंतर्गत सुरु करण्यांत येणा-या नवीन व्यवसाय / तुकडयांना त्यांच्या प्रवेश क्षमतेनुसार २०,१६,१२ एवढी विद्यार्थी प्रवेश संख्या असल्यास २०% प्रमाणे अनुक्रमे ४,३ व २ जागा संस्था व्यवस्थापन समितीद्वारे भरण्यास परवानगी देण्यांत यावी व उर्वरित अधिकच्या (सुपर न्युमरी) १०% म्हणजे अनुक्रमे २,२ व १ जागा संस्थेने प्रचलित पध्दतीने भराव्यात.

३) शासन निर्णय क्र.आयटीआय-/२००८/रिट/(२७/०८)/व्यशि-२, दि.३१ मार्च, २००८ नुसार खाजगी औ.प्र.केंद्राना मशिन गटाला रु.१२,०००/-, मशिन गट वगळून इतर अभियांत्रिकी व्यवसायांना रु.८,४००/- व बिगर अभियांत्रिकी व्यवसायांना रु.६,०००/- हे प्रवेश शुल्क निश्चित करण्यांत आलेले आहे. त्याप्रमाणे विविध व्यवसायनिहाय प्रवेश शुल्काची कमाल मर्यादा निश्चित करण्यांत यावी. तसेच त्यापेक्षा किमान शुल्क घेण्याची मुभा समितीला राहील.

४) प्रशिक्षण शुल्काद्वारे जमा होणारी रक्कम वेळोवेळी संस्था व्यवस्थापन समितीच्या बँक खात्यात जमा करण्यांत यावी व त्याचा विनियोग केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार करण्यांत यावा.

५) उपरोक्त निर्णय फक्त PPP अंतर्गत औ.प्र.संस्थांमधील संस्था व्यवस्थापन समितीच्या निधीतून सुरु करण्यांत येणा-या व्यवसायाच्या प्रवेशाबाबतच लागू राहतील. तसेच ऑगस्ट, २००९ पूर्वी सुरु करण्यांत आलेल्या व्यवसाय / तुकडयांमधील जागांकरीता पूर्वलक्षी प्रभावाने प्रवेश प्रक्रिया करता येणार नाही.

राज्य सुकाणू समितीच्या दिनांक २६ जून, २००९ रोजी झालेल्या बैठकीतील उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने केंद्र शासन पुरस्कृत खाजगी सहभागाने PPP दर्जावाढ करण्यास मान्यता मिळालेल्या राज्यातील शासकीय औ.प्र.संस्थेतील २०% प्रवेश, संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) पुढीलप्रमाणे करण्यास शासनाची मान्यता देण्यांत येत आहे.

| अ. क्र. | तुकडीची प्रवेश क्षमता | अधिसंख्य जागा (सुपरन्युमरी सीटस) (३०%) प्रमाणे प्रवेश क्षमता | प्रचलित पध्दतीनुसार औ.प्र.संस्थेने करावयाची प्रवेश संख्या | संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करावयाच प्रवेश संख्या (PPP) |
|---|---|---|---|---|
| १ | १२ | १५ | १३ | २ |
| २ | १६ | २१ | १८ | ३ |
| ३ | २० | २६ | २२ | ४ |

२. **पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप अंतर्गत निवड झालेल्या औ.प्र.संस्थांतील संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करावयाच्या २०% प्रवेशाबाबतच्या मार्गदर्शक सूचना.**

१. हे आदेश फक्त संस्था व्यवस्थापन समितीच्या निधीतून सुरु करण्यांत येणा-या व्यवसाय प्रवेशाबाबत लागू राहणार असून संस्था व्यवस्थापन समितीने त्यांच्यामार्फत ऑगस्ट, २०१० पासून पुढे सुरु करण्यांत येणा-या सर्व नवीन व्यवसाय/तुकडयामध्ये प्रवेशक्षमतेपेक्षा अधिकचे (सुपरन्युमरी) २० टक्के प्रवेश गुणानुक्रमे द्यावेत. याकरीता स्वतंत्र अर्ज मागवून व स्वतंत्र गुणवत्ता यादी तयार करुन प्रवेश देण्यांत यावेत. ऑगस्ट, २०१० पूर्वी सुरु करण्यांत आलेल्या व्यवसाय / तुकडयांमधील जागांकरीता पूर्वलक्षी प्रभावाने प्रवेश प्रक्रिया करता येणार नाही.

२. सुरु होणा-या नवीन व्यवसाय / तुकडयांना त्यांची प्रवेशक्षमता १२, १६, २० असल्यास २० टक्केप्रमाणे अनुक्रमे २, ३ व ४ जागा ह्या संबंधीत शासकीय औ.प्र.संस्थेच्या संस्था व्यवस्थापन समितीद्वारे भरण्यांत याव्यात व उर्वरित १० टक्के जागा म्हणजे अनुक्रमे १, २, व २ जागा संबंधीत औ.प्र.संस्थेने प्रचलित पध्दतीने भराव्यात.

३. खाजगी औ.प्र.केंद्राना सुधारित प्रशिक्षण शुल्क लागू करण्याबाबतचे आदेश शासन निर्णय क्र.आयटीआय-२००८/रीट/(२७/०८)व्यशि-२,दि.३१ मार्च,२००८ नुसार मंजूर करण्यांत आले आहे. सदर आदेशातील मंजूर प्रशिक्षण शुल्कानुसार खालीलप्रमाणे व्यवसाय गटाकरीता प्रती विद्यार्थी प्रती वर्ष कमाल प्रशिक्षण शुल्क आकारण्यांत यावे.

**अ.** मशिन गटातील व्यवसायाकरीता --------- **रु.१२,०००/-**

**ब.** इतर अभियांत्रिकी व्यवसाय गटाकरीता (मशिन गटाव्यतिरिक्त इतर सर्व अभियांत्रिकी व्यवसाय) तसेच बिगर अभियांत्रिकी व्यवसायातील संगणक गटातील व्यवसायाकीता -- **रु.८,४००/-**

**क.** बिगर अभियांत्रिकी व्यवसाय गटाकरीता (इतर सर्व बिगर अभियांत्रिकी व्यवसाय)--- **रु.६,०००/-**

उपरोक्त प्रमाणे कमाल प्रशिक्षण शुल्काची आकारणी करतांना संस्थेचे ठिकाण जसे ग्रामिण, आदीवासी, दुर्गम व डोंगराळ भाग तसेच स्थानिक परिस्थितीनुसार प्रशिक्षण शुल्काचे किमान दर संस्था व्यवस्थापन समितीला ठरविता येतील, तसेच उपरोक्त विहित करण्यांत आलेल्या शुल्कापेक्षा किमान शुल्क घेण्याची मुभा संस्था व्यवस्थापन समितीला राहिल.

४. संबंधित तालुक्यातील उमेदवारांना प्रथम प्राधान्य देण्यांत यावे. जर उमेदवार उपलब्ध नसल्यास औद्योगिक आस्थापनांच्या प्रत्यक्ष कामगारांना प्राधान्य देण्यांत यावे.
५. आदिवासी संस्थांमधील २० टक्के प्रवेशाबाबत प्रचलित नियमानुसार आदिवासी व सर्वसाधारण गटासाठी ७५:२५ प्रमाणे प्रवेश देण्यांत यावेत.
६. उमेदवार महाराष्ट्र राज्याचा अधिनिवासी असावा.
७. प्रशिक्षण शुल्काद्वारे जमा होणारी रक्कम वेळोवेळी संस्था व्यवस्थापन समितीच्या बँक खात्यात जमा करण्यांत यावी व त्याचा विनियोग केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार करण्यांत यावा.

हा शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक २०१००७०७१३३०२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु.न.जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
सर्व सह सचिव / उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सहसंचालक / उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, नाशिक [संचालक (प्रशिक्षण) यांच्यामार्फत]
सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, [संचालक (प्रशिक्षण) यांच्यामार्फत]
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन (व्यशि १,२,३,४) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (व्यशि-५) २ प्रती.